**पणन विभागाची कालसुसंगत पुनर्ररचना व सक्षमीकरण करण्यासंदर्भात अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा वाढविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१५२५/प्र.क्र.१५१/२१-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: १३ जून, २०२५.

**संदर्भ -** १. सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१५२५/प्र.क्र.१५१/२१-स, दि.२८ मे,२०२५.
२. सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१५२५/प्र.क्र.१५१/२१-स, दि.०६ जून,२०२५.

**प्रस्तावना:-**

पणन विभागांतर्गत मंत्रालयीन स्तरावर व क्षेत्रीय स्तरावर स्वतंत्र आस्थापना करण्यासंदर्भात अभ्यास करुन शासनास शिफारस करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये समिती स्थापना करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये समितीचे सदस्य सचिव “सह सचिव (पणन)” यांच्या ऐवजी “कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे” यांना करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता, सदर समितीची कार्यकक्षा तसेच अहवाल सादर करण्याचा कालावधी वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

पणन विभागाची कालसुसंगत पुनर्ररचना व सक्षमीकरण करण्यासंदर्भात संदर्भाधीन शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या समितीच्या कार्यकक्षेमध्ये खालील विषय अंतर्भूत करण्यात येत आहेत.

१. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, ग्राहक महासंघ यांच्या मत्ता व दायित्व तसेच, आस्थापनाविषय बाबींचा अभ्यास करुन कालसुसंगत पुनर्रचना व सक्षमीकरण करण्यासाठी शासनास शिफारस करणे.
२. राज्यातील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या सचिवासाठी सचिव केडर करण्यासंदर्भात शिफारस करणे.
३. बाजार समितीला सेस लागू करुन नये अशी व्यापाऱ्यांची मागणी असल्याने त्याअनुषंगाने अभ्यास करुन शिफारस करणे.
४. महाराष्ट्र कृषि उत्पन्न पणन (विकास व विनियमन) अधिनियम १९६३ मधील कलम ३४ अ अन्वये खरेदीदाराकडून आकारण्यात येणाऱ्या देखरेख फी च्या शुल्कासंदर्भात अभ्यास करुन शिफारस करणे.

२. सदर समितीस सविस्तर अहवाल १ महिन्याच्या आत शासनास सादर करण्याबाबत संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मुदत या शासन निर्णयान्वये आणखी २ महिने वाढविण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१३१६१८५८४३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAVI SANDEEP SHINDE

Digitally signed by MADHAVI SANDEEP SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=020531e249e88fe74bf6db805f42944e7f29bc0ba6134c83c1f183b8cc27f2ff, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB1CBBD6A4EE442FDAA6C1B358BF61FEAF9AEFC16E8F39E9EE1D06B9E8A7A59, cn=MADHAVI SANDEEP SHINDE
Date: 2025.06.13 16:20:07 +05'30'

**(माधवी शिंदे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (पणन), महाराष्ट्र शासन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सहकार व पणन, मंत्रालय, मुंबई.
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
५. श्री.सुधीर कुमार गोएल,भा.प्र.से.(से.नि.)
६. श्री.उमाकांत दांगट,कृषि आयुक्त,(से.नि.)
७. श्री.सुनील पवार, पणन संचालक (से.नि.)
८. निवडनस्ती.